**पुणे शहराकरीता नविन टोईंग व्हॅन प्रकल्पास मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरए-०४१८/प्र.क्र.३३/पोल-८**
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई.
दिनांक : १५ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :** १) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दिनांक २०.०५.२०१५
२) पोलीस आयुक्त, पुणे यांचा क्रमांक डीसीपी/ट्रॅफिक/४०२१/२०१८, दिनांक २१.०४.२०१८ चा प्रस्ताव

**प्रस्तावना :**

पुणे शहर हे घनदाट लोकसंख्येचे शहर असून माहे सप्टेंबर, २०१७ पर्यत पुणे शहरात ५१ लाख वाहने असल्याची नोंद आहे, तसेच पुणे शहरात दरमहा ६,००० पेक्षा जास्त वाहनांची नोंदणी होते. बहुतांशी वाहनधारक त्यांची वाहने रस्त्यांच्या कडेला पार्क करुन ठेवत असल्याने वाहतूकीकरीता कमी रस्ता उपलब्ध राहून वाहतूक कोंडीचा प्रश्न निर्माण होतो. रस्त्यांवर उभी राहणारी वाहने हटवून वाहतूक कोंडी दूर करण्याच्या कामाकरीता पुणे वाहतूक पोलीसांकडून सन २०१६ पासून ५ खाजगी टोईंग व्हॅन ऑपरेटर्सकडून सेवा घेतल्या जातात. मात्र सदर सेवा या पारंपारिक पध्दतीच्या असल्याने त्यामध्ये अनेक त्रुटी (वाहन अनधिकृतरित्या पार्क आहे याबाबतचा पुरावा नसणे, वाहनास नुकसान न होता वाहन उचलता न येणे, अवजड वाहने उचलता न येणे, कामातील त्रुटींबाबत कंत्राटदारास दंडीत करता न येणे, ई-चलान सुविधा नसणे इ.) निदर्शनास आल्या आहेत. या सर्व बाबींमध्ये सुसुत्रता यावी व शहरातील वाहतूक सुरळीत होण्याच्या दृष्टीने पुणे शहराकरीता अद्ययावत टोईंग व्हॅन सेवा उपलब्ध करुन देण्याकरीता पोलीस आयुक्त, पुणे यांनी प्रस्तावित केलेल्या कार्यवाहीस गृह विभाग, शासन निर्णय दिनांक २०.०५.२०१८ नुसार प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

दिनांक २०.०५.२०१५ रोजीच्या गृह विभाग, शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यांत आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिलेल्या मान्यतेनुसार पोलीस आयुक्त, पुणे यांनी शासनास दिनांक २१.०४.२०१८ नुसार सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन पुणे शहराकरीता नविन टोईंग व्हॅन प्रणाली अंमलात आणण्याबाबतच्या कार्यवाहीस प्रशासकीय मान्यता (Administrative Approval) देण्यांत येत आहे.

२. निविदा प्रक्रियेअंती यशस्वी निविदाकारास कार्यारंभ आदेश (Work Order) देण्यास प्रकल्प अंमलबजावणी समितीने मान्यता दिल्याने पोलीस आयुक्त, पुणे यांनी त्यानुसार पुढील आवश्यक कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक २०१८१११६१०२४५१५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sudhakar D. Pawar

Digitally signed by Sudhakar D. Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2c1ebd27661971090dc2c91d4bb9caabd4da394aa85829a09265097faf097ba5, cn=Sudhakar D. Pawar
Date: 2018.11.16 16:57:12 +05'30'

**( सु. धों. पवार )**
अवर सचिव, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२. मा.राज्यमंत्री, गृह(शहरे) यांचे खाजगी सचिव
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. पोलीस आयुक्त, पुणे
५. निवड नस्ती (पोल-८), गृह विभाग.